नवनाथ भक्तिसार    अध्याय पाचवा

हिंगळा देवीच्या दर्शनासाठी आलेल्या मच्छिंद्रनाथाची कसौटी घेण्याचे जे धाडस देवीच्या अष्टभैरवांनी दाखविले आणि त्यामुळे जो हाहाकार माजला आहे हे आपण मागील अध्यायात पठण केले. त्यामधून नाथांची तपशर्या आणि त्यांनी कठोर प्रयासांनी मिळविलेल्या सिद्धींवरची परिपूर्णता अंबामातेला जाणवली. देवीच्या आशीर्वादाबरोबर दोन संरक्षक अस्त्रांची वरदान रुपात मिळवलेली भेट घेऊन नाथ, बारा मल्हारनामक विस्तीर्ण अशा अरण्यमय प्रदेशांतून वाटचाल करीत होते. सूर्यास्तानंतर मुक्कामासाठी वनग्रामातील एका देवळात ते राहिले. वातावरणात रात्रीचा काळोख दाटला, घनदाट वनातील ते चिमुकले गाव भीतीने जणू आकुंचन पावले होते. त्या भयावह काळोखात रातकिड्यांचा कर्कश आवाज, परिसरातील गूढ चित्रविचित्र अर्थहीन ध्वनींची भर पडू लागली, मच्छिंद्रनाथ जागेच आहेत, रात्रीचे दोन प्रहार झाले आहेत. आता तर त्या अरण्यावर काळाकभिन्न अंधारच वर्चस्व ठेऊन आहे, अशी स्थिती उद्भवली. प्रकाशाचा एकही सूक्ष्म बिंदू आढळत नाही पण अचानक असंख्य दिवव्या तिथे दिसू लागल्या. पूर्व पश्चिम दक्षिण उत्तर या दिशा आणि उपदिशा तसेच खाली आणि वर असा चक्राकार वेगात त्यांची हालचाल भयावह वाटत होती. तो प्रकाश दिवव्यांचा धिंगाणा पाहून मच्छिंद्रनाथ मनोमनी समजले की ही तर भुतावळ आहे. त्यांना वश करून घेण्याची ही संधी साधता आली. तर कधी काळी त्याचा उपयोग हुमखास करता येईल.

येथे श्रद्धाळू भाविकांच्या मनात संदेह निर्माण होऊ शकतो की परमेश्वरी कार्यासाठी अवतार घेतलेल्या अवलीयांना भूतांचा काय उपयोग ? भुते तर विध्वंसक किंवा विपरीत कर्मे करण्यात आनंद मानतात! पण वास्तवात तसे नाही. भूत योनी श्रीरामाच्या उपयोगी पडल्याचा पुराणांत उल्लेख आहे. राम रावणाच्या घनघोर रणसंग्रामात युद्धभुमीवरून राक्षसांची प्रेते पळवून भूतांनी श्रीरामाच्या विजयासाठी हातभार लावला. कलियुगात भूत तुळसीला प्रसन्न झाले. कोणतेही महान कार्य घडून येण्यासाठी लहानांपासून महानांपर्यंत सर्वांचीच आवशक्यता असते. प्रसंग पडताच वनराज सिंहाला मुषकाची मदत झाल्याचा उल्लेख नितीकथांमध्ये वाचण्यास मिळतोच.

मच्छिंद्रनाथांनी संधी साधली. हिंगळादेवी माते कडून प्रसाद रूपाने प्राप्त झालेले 'स्पर्शास्त्र' मंत्र सिद्ध करून मच्छिंद्रनाथांनी विभूती फुंकताच सर्व भूतांचा पाय भूमीला चिटकून, ती एकाच जागी वृक्षासारखी खिळीली गेली. त्यांची हालचाल थांबली. स्तब्धपणे ते अचल झाले. महाभारतातील कैरव पांडव युद्धातील महारथी कर्णाच्या रथाचे चाक धारीत्रीने गिळल्यामुळे रथाची गतीच कुंठीत केली होती. तिच अवस्था धरतीने भुतांच्या पायाच्या गतीलाच कुंठीत करून टाकली. क्षणापूर्वी हैदोस घालत निघालेली ही भुतावळ जागच्या जागी तटस्थ झाली. खरं तर त्या विशिष्ठ दिवशी पृथ्वीवरील समस्त भुतावळ भूतराज आग्या वाताळाच्या दर्शनासाठी एकत्र जमणार होती. त्यापैकीच ही भूतावळ सुद्धा वेताळ दर्शन सोहळयासाठी निघाली होती. परंतु येथे चिकटून राहिलामुळे इष्ट मुक्कामी पोहोचू शकली नाहीत. तिथे वेताळाने आपल्या प्रजननांची मोजणी केली असता संख्या कमी भरली, त्याला अपमान वाटला, तेव्हा काळजीने वेताळाने इतर भूतांना विचारले. "बारा मल्हार येथील अरण्यातून शरभ तीरवरील भूतजमात का बरे उपस्थित राहिली नाहीत? ही घटना म्हणजे सरळ सरळ मानहानीच होती भूतराजाची. "पाच सात प्रमुख भूतानी त्वरेने निघा आणि तपास करा." भूतराजाची आज्ञा शिरसावंध मानून तात्काळ पाच सात प्रमुख भूतांचे म्होरके वायुवेगाने बारामल्हार अरण्यात येऊन पोहोचले आणि पाहतात तर काय? आपले सकळ भाऊबंद भूमीला चिकटून असहाय्यपणे उभे आहेत (म्लानवदन करून)

चौकशी निमित्त आलेल्या त्या भूतांनी विचारले; काय प्रकार आहे हा? असे अचलपणे भूमीवर चिकटून उभे राहण्याचे कारण काय?"

जमिनीशी पाय चिकटून असलेली भूतावळ म्हणाली, "काही कळेनासे झाले आहे. आमचे सर्वांचे पाय भूमीला चिकटले आहेत. प्रयत्न करूनही चिकटा सुटत नाही. कोणा सिद्धी प्राप्त झालेल्या शक्तिमान योग्याने ही खेळी केली असावी. हे शोधण्यासाठी ते पाच सात जणं गुप्तपणे निघाले. स्मशान शांतता असलेल्या त्या खेड्यामधील देवळात टेहळणीसाठी आलेल्या या भूतांना सिद्धासनावास्थेत मच्छिंद्रनाथ दिसले. गर्द काळोखात सुद्धा त्यांच्या देहाभोवती सौम्य असे प्रकाशवलय पसरले होते. तेजस्वी चेहरा, विशाल कपाळावर भस्माचे तीन आडवे पट्टे आणि मध्यभागी उभा शेंदूर रेखवलेला, रत्नासारख्या तेजस्वी कर्णमुद्रिका, भरदार पिंगट मिशा, वडाच्या चिकाने वाळलेल्या सोनेरी केसांचा जटाभार सरळ धारधार नाक, तेजस्वी टपोरे डोळे, भेदक नजर, कणखर आजानुबाहू देहयष्टी, नाथपंथीय, लेणी धारण केलेली. हातात कडे, कुबडी, फावडी, शैली, शिंगी, त्रिशूल, चिमटा... योगीयांचा योगी साक्षात बारावा रुद्र! हे भुतांनी जाणले ते म्हणाले की, "स्वामीजी! येथील भूतांना आपण कशासाठी बंधनात अडकवले आहे? कृपया त्यांना मुक्त करा. त्यांच्या कामात व्यत्यय आणू नका!!"

मच्छिंद्रनाथ म्हणाले, "अरे! सार्वजण भूमीवर चिकटून बद्ध आहेत, तुम्ही नेमके कसे मुक्त राहिलात?" त्यावर उत्तर मिळाले, "स्वामीजी ! आम्ही येथे नव्हतो, भूतराज वेताळाने यांच्या चौकशीसाठी आम्हास पाठविल्यामुळेच आम्ही मुक्त आहोत, तरी आता तुम्ही यांना सोडा. आम्हाला वेताळाच्या दर्शनासाठी जाणे अगत्याचे आहे."

"अरे! असां मी सोडणार नाही. वेताळ तुमचा राजा आहे ना? मग त्याला सांगा ना सोडवायला ?" स्वामींनी त्यांना पर्याय दिला.

त्यावर वेताळाचे प्रतिनिधित्व करण्यासाठी आलेली भूतमंडळी रागावली, "स्वामीजी! याचा परिणाम चांगला होणार नाही. तुम्हाला माहित असायला हवे, वेताळ फार पराक्रमी आहे. तो जर खवळला तर अतिभयंकारी प्रकार घडतील. ब्रह्मांडाचा चेंडू करून खेळण्याची त्याची शक्ती आहे. देव, दानव, गंधर्व, हे सुद्धा बलाढ्य वेताळापुढे नांगी टाकून पलायन करतात. त्याची आजपर्यंत कुणी कुरापत काढली नाही. आपण तर संकटाला निमंत्रण देत आहात!"

स्वामी धीरोदात्तपणे उत्तरले, "अरे भूतांनो! येथे नुसत्या वल्गना करू नका, तुमच्या भूतराजाला जाऊन सांगा. मी त्यालाच आव्हान देण्यासाठी ही कृती केली आहे. मलाही त्याचा पराक्रम पाहावयाचा आहे"

बरे आहे महाराज! अवश्य आपला निरोप सांगतो, आता भोगा तुमच्या कृतीचे परिणाम!!" असे म्हणत त्वरेने ती भुते वेताळाकडे परतली त्यांनी सविस्तर घटना कळविल्यावर भूतांचा सर्वेसर्वा आग्यावेताळ संतापाने लालीलाल झाला. बेभान होऊन त्याने हुकुम सोडले. "अष्ट भूतपतींना सांगावा धाडा. सर्व भुतावळ सेन्य एकत्र करा. जा!! वेताळराजाच्या आज्ञेप्रमाणे तत्काळ अगणित भूतदुत देशोदेशी त्वरेने निघाले, अरबस्थान, पंजाब, गुजरात, बंगाल, माळवा, मेवाड, तेलंगण, कर्नाटक, सर्व दक्षिण भाग, कुडाळप्रांत (कोकणामधील), ठाणे जिल्ह्याच्या आसपासचा कैकाड प्रांत, सप्त दिप (दिवा, दमण वगेरे) इत्यादी सर्व ठिकाणीची आठ कोटींची भुतावळ जमा झाली. त्यांचे प्रमुख अष्ट सेनानायक महावीर, म्हंमद्या, महिषासुर, धुळोवान, बाबर, झोटिंग, मुंजा, आणि नरसिंह यांच्याकडे चढाईची अधिकार सुपूर्द करून भूतराजा आग्यावेताळ त्यांचे नेतृत्व करू लागला. हल्ल्याच्या योजनेप्रमाणे भूतसेने समवेत बारा मल्हार अरण्यातील खेड्यात

येऊन थडकला. त्या भुतांच्या आरडाओरड्यांनी तो परिसर दणाणून गेला. संतप्त झालेला हा पिशाच्च सागर पाहून मच्छिंद्रनाथ जराही चलविचल झाले नाहीत. त्यांच्याकडची अमोघ शस्त्रास्त्रे म्हणजे मंत्रस्मरणशक्ती रूपातील धनुष्य आणि भास्मझोळीत असलेले विभूतीरूपी बाण सज्ज ठेवले. वज्रास्त्र मंत्र जपून स्वतःभोवती विभूतीने रिंगण काढले, त्यामुळे सुरक्षा कवच तयार झाल्याने त्या रिंगणाच्या आत भूतावळीला प्रवेश बंध झाला होता. थोडे भस्म कपाळाला लावून नाथ स्वस्थचित रिंगणात बसले, आठ कोटी भूतांनी सामुदायीकपणे हल्ला चढवून घनघोर पावसाप्रमाणे शस्त्र वर्षाव केला. अष्टभूतपतींनी विशाल रूप धारण केले आणि असंख्य वृक्ष उपटून नाथांवर मारा लेला पण वज्रास्त्रमंत्राने भारलेले रिंगण वज्रकवचासारखे नाथांचे संरक्षण करीत होते. त्या वज्रकवचाला धडकून भुतांनी फेकलेली झाडे निष्प्रभ ठरली. परिणामी विभूती रिंगणाच्या सभोवताली झाडांची रस जमा झाली. भुतांनी त्या ढिगावर पालापाचोला सुखलेले गवत टाकून आग लावली. आकाशाला स्पर्श करतील अशा अग्नीज्वालांनी तो परिसर धडधडू लागला. नाथांनी पर्जन्यास्त्र सोडून तो अग्नीप्रलय शांत केला. मग नाथांनी स्वतःच अग्निस्त्र मंत्राने भूतावळीच्या सभोवार आगीचा लोळ निर्माण केला. त्यामुळे भूतांची पळापळ झाली. अग्नी विझविण्यासाठी सागराचे पाणी आणून शिंपडता शिंपडता भुते गालीतगात्र झाली नाथांनी पुन्हा पर्जन्यास्त्र सोडून भूतांभोवती अग्नी शांत केला. अग्नी विझताच आकाशात पळलेली भुते पुन्हा जमिनीवर हल्ला करू लागली. नाथ या क्षणाची वात पाहत होते. त्यांनी त्वरेने स्पर्शास्त्र सोडून आठ कोटींच्या भूतावळीला धरणीशी चिकटवून टाकले. पहिल्या चीकट्यांप्रमाणे हे सुद्धा जमिनीत सजीव पुतळे म्हणून स्तब्ध झाले, अचल अवस्थेमुळे प्रतिकाराची गतीच मंदावली पण विशेष म्हणजे भूतवळीचे अष्ट सेनानायक मात्र महाबलाढ्य झुंझार योद्धे होते. त्यांनी मात्र स्पर्शास्त्राला जुमानले नाही. ते घनघोर हल्ले करीत राहिले. परंतु स्पर्शास्त्राच्या प्रभावामुळे फरफट झाल्याने काही प्रमाणात शक्तिपात झालाच होता त्यामुळे त्यांची अदृश्य होण्याची शक्तीच नाहीशी झाली होती. नाथांना बद्धपाशात आवळण्यासाठी त्यांनी रिंगणात प्रवेश करण्याची शिकस्त केली पण वज्रकवचामुळे ते धडकू लागले. घायाळ होऊ लागले. महापराक्रमी आग्यावेताळाने अत्यंत क्रोधाने साक्षात वज्रास्त्र कवच गिळून टाकले त्यामुळे क्षणभर मच्छिंद्रनाथ सुद्धा स्तिमित झाले, परंतु त्यांनी स्वतःला सावरले आणि त्याचावर वासवास्त्र सोडले. आग्यावेताळ आणि वासवास्त्राची कुस्ती जुंपली त्यांची कुस्ती एकमेकांवर डाव प्रतिडाव, प्रहार, आदळआपट, धडका, देत सुरु होती. एकमेकांशी झुंजतांना अप्रत्यक्षपणे वातावरणवरही त्याचा परिणाम होत होता. महासागरांवर लाटा उसळल्या आणि वादळसदृश्य परिस्थिती उद्भवली, शेषनागानेही मस्तक हलीवले, डळमळणारा पृथ्वीगोल सावरण्यासाठी वराहाला नेटाने प्रयत्न करावे लागले. भूतवळीच्या अष्ट नायकांची सरशी होतेय की काय? कारण अष्ट नायकांनी मुसंडी मारली आणि नाथांचे पाय धरण्याचा प्रयत्न केला, पण नाथानी चपळाईने जागा बदलली आणि पुन्हा वज्रास्त्र कवच तयार केले. त्यानंतर दानावास्त्रांचे नामस्मरण जपून मधु, तिल, कुंभकर्ण, मरू, मालीमल, मुचकुंद, त्रिपुर, असे सात दानव जागविले, भूतनायक आणि मंत्रदानव यांचा घनघोर रणसंग्राम सुरु झाला. एक संपूर्ण दिवस आणि पूर्ण रात्रभर अथकपणे ही दंगल चालली होती लत्ताप्रहार, मुष्टीप्रहार कृस्त्या असे नाना शक्तीप्रयोग करून भूतनायक आणि नाथांनी मंत्राद्वारे निर्माण केलेले दानव एकमेकांचा पाडाव करण्यासाठी झुंजत होते. मर्म स्थानांवर प्रहार करून जेरीस आणत होते. अखेरीस भूतपती घायाळ झाल्याचे पाहून मंत्रदानव अदृश्य झाले. आठव्या भूतपतीला एका मंत्रास्त्राने घायाळ केले आणि आग्यावेताळाला आसमान दाखविले.

मच्छिंद्रनाथांनी भूतवळीला नमविण्याचे सूत्रे स्वतःकडे घेतली आणि पुनश्च आठ कोटी भूतसेना थरारली. नाथांनी वाताकर्षण मंत्र सोडून त्यांच्या भोवतीचा वात काढून निर्वात पोकळी तयार केली. त्यांच्या वायुअभावी श्वास कोंडला.

अक्षरशः प्राण कंठाशी आले. हालचाली क्षीण होऊन मूर्च्छा येऊ लागली आता आपली धडगत नाही याची त्यांना जाणीव झाली. अंतिम क्षण समीप आला आहे हे ओळखून ते एकमेकांशी बोलू लागले. “आता प्राण वाचवायचे असतील तर आपला अहंपणा सोडून या योग्याला शरण जाणे हाच पर्याय आहे. जसे विभिषणांचे आणि सुग्रीवाचे रक्षण प्रभू रामचंद्रांनी केले होते. त्याचप्रमाणे हा जोगीच आपले रक्षण करील. त्याच्याशी समेट करून सख्य साधले तरच आपण वाचणार!” असा सर्वानुमते निश्चय ठरला आणि ते मच्छिंद्रनाथांना म्हणाले, “अहो तापोनायक जोगी महाराज! तुमच्या शौर्याची सीमा झाली, आता आम्ही तुम्हाला शरण आलो आहोत, आम्हाला वाचवा, आम्ही अज्ञानापोटी तुमच्याशी नाहक संघर्ष केला, त्याची शिक्षा आम्हाला मिळाली आहे. शुक्राचार्यांनी कचाला संजीवनी देऊन वाचविले. तुम्ही आम्हाला पण संजीवनी द्या. आता आम्हाला मरण देऊ नका. जटायू संपातीने सूर्यावर आक्रमण केल्यावर जी दशा झाली तशीच आमची अवस्था झाली आहे, महाराज! आता आमचा अंत जवळ आला आहे, तुमच्याशी बोलण्याचीही शक्ती आमच्यात राहिली नाही. आता वेळ दवडू नका, आम्हाला अभय द्या. आम्ही जगात तुझे गुणगायन करू. तू सांगशील ती सेवा करू. आमच्या सकल भुतावळीसह तुझी चाकरी निभावू! तुझे दास होऊ. आम्ही हे जर खोटे बोलत असू तर आम्हाला गोहत्या, स्त्रीहत्या, बालहत्या, मातृ पितृ हत्या अशा पंच महापाताकांचे पाप लागेल स्वामी!! दया करा.”

त्यांचा प्राण घेणे हा मच्छिंद्रनाथांचा उद्धेश कधीच नव्हता. द्यांचे कळवळणे आणि भयग्रस्थ अवस्था पाहून नाथ म्हणाले, “भूतराज! मी शाबरी विद्यचे मंत्रकाव्य केले आहे. त्यासाठी तुम्ही सहकार्य करावे. त्यातील मंत्र कोणीही उच्चारला तरी मंत्राच्या अर्थाप्रमाणे वागून तुम्ही ते कार्य सिद्धीस न्यावे. बोला!! काबुल आहे माझी मांगणी?”

“आम्हाला काबुल आहे, आम्ही तुमच्या शब्दाबाहेर जाणार नाही, वचन देतो आमच्यावर विश्वास ठेवा” असे आश्वासन सकल भूतावळीने दिले. नंतर नाथांनी सर्व मंत्राचा साधनाविधी त्यांना सांगितला. मंत्र सिद्ध होण्यासाठी ग्रहण काळात मंत्र उजळणी करण्यास सांगितले, तसेच मंत्रानुष्ठानाच्या वेळी कोणते भूतवळी द्यावेत ते सांगितले. मच्छिंद्रनाथांनी वातप्रेरक अस्त्र सोडून हवा सुरू केल्याने त्यांचा श्वास सुरु झाला. विभक्तास्त्र मंत्रून आठ कोटी संख्येच्या भुतावळीला एका क्षणात एकाच वेळी मुक्त केले. सर्वजण नाथांच्या जयजयकार करू लागले. नम्रपणे हात जोडून सभोवताली उभे राहिले. आकाशातील नक्षत्रांच्या मेळाव्यात चंद्रबिंब जसे शोभून दिसते. किरणांच्या प्रभेमध्ये सूर्य शोभायमान दिसावा, देवांच्या दरबारात इंद्र शोभावा, शिवगणात श्री शिव शोभायमान दिसावा. विष्णूगणात श्री विष्णू शोभावा, दानावांमध्ये शुक्राचार्य शोभावेत, देवामध्ये बृहस्पती शोभावेत, सैन्यामध्ये ऐरावत शोभावा तद्वत पिशाच्चमंडळात मच्छिंद्रनाथ शोभत होते. सर्व भूतांनी नाथांचे चरणस्पर्श करून वंदन केले. नाथांनीही त्यांना ‘क्षेमकुशल’ असावे असा आशीर्वाद दिला.

भूतराज वेताळ आणि अन्य प्रमुख नायकांनी सर्व भूतवाळीला हुकुम केला की, “मच्छिंद्रनाथांनी जगतकल्याणासाठी शाबरी मंत्रकाव्य निर्मिती केली असून त्या मंत्राचा अधिकार मान्य करावा. त्यांतील आज्ञेचे पालन करूण भुतांनी सहाय्य करावे. मंत्रपाठ उच्चारातच अपेक्षित कार्यात यश आले पाहिजे त्यांत कसूर होता कामा नये”

“होय महाराज! आपण म्हणाल तसेच होईल” सर्व भुतावळ हात जोडून म्हणाली.

त्यानंतर मच्छिंद्रनाथ म्हणाले, "आणखी एक वर मला द्यावा. तुमचे माझे समरांगण झाले, त्याचे आख्यान लोकांत प्रसिध्द होईल. ते आख्यान जो संग्रही बाळगेल, त्याला प्रिय मानावा. त्याच्यावर संकट आले तर आपणाकडून त्यांचे निवारण व्हावे. तुमच्याकडून त्या व्यक्तीस भास होता कामा नये. ज्या घरात हे आख्यान असेल तेथे भूतांनी वावर करू नये. त्या घरावर काही विघ्न आल्यास सर्व भुतांनी मिळून त्याचे निवारण करावे. इतकेच नव्हे तर त्या घरांतील कोणी व्यक्ती रस्त्याने जात असतील तर, भूतांनी तो मार्ग सोडून दूर बसावे. त्यांना कधीकाळी बाधा होऊ नये. कृपा करून मला हे वरदान देण्याची विनंती आहे." नाथांनी ही निःस्वार्थी जनकल्याणार्थाची ही विनम्र मागणी ऐकून भुते म्हणाली, " अवश्य! स्वामी!! त्या घरातील व्यक्तींना किंवा त्या घराला आम्ही पिडा देणार नाही. हे आमचे वचन आहे. आता आम्हाला जाण्याची आज्ञा द्यावी" भूतभूपाळ आग्यावेताळ, अष्टभूतपती, आणि सर्व आठ कोटी भुते मच्छिंद्रनाथांना वंदन करून त्यांचा जयजयकार करीत परतली मच्छिंद्रनाथांनी बारा माल्हारांची पूजा करून दर्शन घेतले आणि पुढे कालीका देवीच्या दर्शनाची मनोकामना धरून मार्गस्थ झाले.

फलश्रुती: या अध्यायच्या पठणाने घरात भूतसंचार होणार नाही. पूर्वीचा भूतसंचार असेल तर तो दूर होईल तसेच त्या घरातील व्यक्तींना भूतबाधा होणार नाही.